**सक्षम प्राधिकारी भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, औरंगाबाद विभाग, औरंगाबाद या कार्यालयातील “सक्षम प्राधिकारी” पदाचा तसेच “अधीक्षक वर्ग-२” पदाचा, <u>अतिरिक्त कार्यभार सोपविणे बाबत.........</u>**

# महाराष्ट्र शासन

## गृहनिर्माण विभाग

**शासन आदेश क्रमांक : भानिका-२०१८/प्र.क्र.३७/गृनिधो-१**

नविन प्रशासन भवन, ६ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक : २५ सप्टेंबर, २०१९.

**<u>शासन आदेश</u>**

सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती या कार्यालयातील सक्षम प्राधिकारी हे पद रिक्त आहे. यास्तव प्रशासकीय कामाची निक़ड विचारात घेता, सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती या पदाचा अतिरिक्त कार्यभार श्री.महेश त्रिंबक ठवरे, सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर यांच्याकडे पुढील आदेश होईपर्यंत सोपविण्यात येत आहे. तसेच त्यांना सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती या कार्यालयाचे नियंत्रक अधिकारी म्हणून देखील घोषित करण्यात येत आहे.

२. सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती या कार्यालयातील “अधीक्षक वर्ग-२” पदाचा अतिरिक्त कार्यभार, श्रीमती माधुरी रमेशराव देशमुख, “अधीक्षक वर्ग-२” सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर कार्यालय, यांच्याकडे सोपविण्यात येत असून, त्यांना सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती या कार्यालयाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून देखील घोषित करण्यात येत आहे.

३. सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, पुणे, नाशिक, नागपूर, अमरावती व औरंगाबाद या कार्यालयांतील निम्नश्रेणी लघुलेखक, लिपिक-टंकलेखक, प्रोसेस सर्व्हर व शिपाई पदांच्या पदभरतीकरिता घेण्यात आलेल्या परीक्षेचा निकाल महापरिक्षा पोर्टलवर दि.३० ऑक्टोबर, २०१८ रोजी घोषित करण्यात आलेला आहे. या निकालाआधारे तयार करण्यात आलेल्या निवडसुचीला शासन पत्र, गृ.नि.वि., क्र.भानिका-२०१८/प्र.क्र.६०/ भाग-१/गृनिधो-१, दि.११/०२/२०१९ अन्वये शासनाची मान्यता कळविण्यात आलेली आहे. सदर मान्यतेनंतर एक वर्षाचा कालावधी दि.१० फेब्रुवारी, २०२० रोजी पूर्ण होत असल्याने, शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक : प्रानिमं/१२१६/ (प्र.क्र.६२)/१६/१३-अ, दिनांक १३ जून, २०१८ च्या परिच्छेद क्र.१३(१) मधील तरतुदीनुसार ही निवड सुची दि.१० फेब्रुवारी, २०२० पर्यंत विधीग्राह्य राहील व त्यानंतर ती व्यपगत होईल. तरी, सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती या कार्यालयातील पदांवरील पद भरतीची प्रक्रिया दि.१० फेब्रुवारी, २०२० पुर्वी पूर्ण करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०९२७१३१६२६०५०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Farooq Ahmed Noorkhan Pathan
Date: 2019.09.27 13:17:48 +05'30'

**( फा. नू. पठाण )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रत,**

१) महालेखापाल १/२, ( लेखापरीक्षा ), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल १/२, ( लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, नागपूर विभाग, नागपूर,
४) सक्षम प्राधिकारी, भाडे नियंत्रण कायदा न्यायालय, अमरावती विभाग, अमरावती,
५) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती/नागपूर.
६) निवड नस्ती (गृनिधो-१).